केंद्र शासनाच्या ग्राहक मंचाचे बळकटीकरण करणे (Strengthening of Consumer Fora) या योजनेच्या शक्तीप्रदान समितीस सहाय्य करण्यासाठी "समन्वय अधिकारी" नेमणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक- ग्रासंअ-२०२०/प्र.क्र.६१/ग्रासं-४,**

मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२.

दिनांक- १८ जानेवारी, २०२२.

वाचा:- १. समक्रमांक शासन निर्णय दिनांक १९.१.२०२१.

२. मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे सु-मोटो रिट पिटीशन क्र.२/२०२१ मधील दि.१.१२.२०२१ रोजीचे निर्देश.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या ग्राहक मंचाचे बळकटीकरण करणे (Strengthening of Consumer Fora) या योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक १९.१.२०२१ च्या शासन निर्णयान्वये शक्तीप्रदान समितीची स्थापना करण्यात आलेली आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाने सु-मोटो रिट पिटीशन क्र.२/२०२१ मध्ये दि.१.१२.२०२१ च्या निर्देशामध्ये या योजनेअंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी विहित वेळेत खर्च करण्यासाठी तसेच निधी व्यपगत होऊ नये याकरिता निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर होतील याकरिता शक्तीप्रदान समितीला सहाय्य करण्यासाठी "समन्वय अधिकारी" नेमण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार श्रीमती चारुशीला तांबेकर, सह सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग तथा सदस्य शक्तीप्रदान समिती यांची समन्वय अधिकारी म्हणून सदर शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११८१४०६२७९९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Katikar Padmavati

Digitally signed by Katikar Padmavati
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a8ad7b53d0557c046089b7688f952dd3fa64ce328691d88242bbde043cba86c, serialNumber=ec2d6c76e02d91ee9f71efe012213ab98a56fdcc6bffb5ce4ef3fafa682eb741, cn=Katikar Padmavati
Date: 2022.01.20 11:19:42 +05'30'

**( प. न. काटीकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

२. महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखा व परिक्षा), मुंबई.
३. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई यांचे खाजगी सचिव,
५. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
६. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
७. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मुंबई
८. प्रबंधक (प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग,मुंबई.
९. निवडनस्ती (ग्रासं-४).